# ४ पाव १ मिसळ तडका मारके

**E Book 182**

मराठी भाषा गौरव दिन २०२३




मिसळपाववर स्वागत!



ज्ञानदेवे रचिला पाया, तुका झालासे कळस!

मिपा दिवाळी अंक २०२२

## मिसळपाव संस्थळावरील चटपटीतील रंजक लेख

# ५. किती बार बोला - मत पी, मत पी. साला ऐकताइच नई ...




"खाना खाना के बाद आधा घंटा रुकने को बोला बुड्ढा लोगने... बादमें पानी पीने का... ये सुनताईच नहीं।"

"पेट में बैठा लोग को तकलीप होता भाय... हररोज नया हाटेल में मेनू कार्ड पकडकर साला उलटा सीधा खाता है... हज़म कैसा करायेंगे हम लोक... दो घास के बाद पानी पीता, कोक मूं लगाता, फिर पिझा के टुकडे मूं में ढकलताए... ठीक से चबाता भी नही...फिर पीता ए...

अपनके साथ अब नही जमता... जूस बनाना फिर मिक्स मार के डायजष्ट कराना पडता ..

डॉक्टर के पास भी भेजा, हार्टभाई को भी मंजूर नही पडेला है... उसने बोला, "उसके उप्पर भी बड़ा प्रेशर पडेला है, धक्का मार मार कर वो काम चला रहा है, बोला

अब नही मानता तो उसका नाडी गडबड करेगा. ठोका नही पडेगा तो फिर दौडने दो साले को.. "

" उसका बाप बोलता था, खाना खाते समय पानी पीनेका नही... अद्धा घंटा रुकने के बाद खूप पीनेका.. एकदम सही था... "

" चल चल, काम पर लगा रह.. "

दुसऱ्या डायजेस्टीव्ह जूसनी आपापसांत म्हटले... छोट्या आतड्याचा टोलनाका जवळ आलेला पाहून दोघेही पुढच्या घासाच्या कामात " घुल-मिलने लगे... "

---

# 1. मज सांग बंधो, कथा एका लाल मिरचीची...



*असे ऐकली कथा अकलेच्या कांद्याची अन् चाळीतल्या बटाट्यांची*
*मज सांग बंधो, कथा एका लाल मिरचीची...*

*लवंगी मिर्चीने रंगवली लावणी अन् मामाच्या घरच्या केळ्याच्या शिक्रणी*
*मज सांग बंधो, कथा एका लाल मिरचीची...*

*तर मग ऐक परि, कथन करीन गद्यातूनि, ...*

*कथा ही एका लाल मिरचीची...*

चार एक वर्षापुर्वीची गोष्ट...

असाच एकदा एका किराणा मालाच्या दुकानात सामान आणायला गेलो होतो. गर्दी होती म्हणून बाहेर उभा असता नजर पडली एका सुक्या मिर्चांच्या पोत्याकडे. त्या तकतकीत मिर्च्यांच्या लाल चुटूक रंगाची मोहिनी मला पडली अन त्यातली एक सहज चाळा म्हणून मी खुळखुळ्यासारखी वाजवून पाहिली. मजा वाटली म्हणून वाण्याला माझ्या मालात त्या एका मिर्चीचा हिशोबही चुकता केला. घरी आलो. वाटले जरा नातीला खुळखुळ्यासारखे वाजवून खुष करेन. रात्री जेवणानंतर त्या मिर्चीला मी सर्वांना दाखवत म्हटले, ‘चला आता आपण एक खेळ खेळूया. या मिर्चीत किती बिया असतील याचा अंदाज बांधायचा. दहा टक्के इकडे तिकडे चालेल. ज्याचा अंदाज अचुक येईल त्याला एक कॅडबरी बक्षीस.’

कागदावर जो तो लिहायला लागला. प्रत्येकानी डोके लढवले. कोणी २० तर कोणी ३०, कोणी ४०, जास्तीत जास्त ५० पर्यंत अंदाज वर्तवले. नंतर ती मिर्ची फोडून बिया मोजता आम्हाला थक्क व्हायला झाले. त्यात तब्बल ८० बिया निघाल्या! अंदाज कोणाचाच बरोबर आला नाही पण यापेक्षा त्यातील बियांच्या संख्येने आम्हाला विचारात पाडले. मला वाटले या बिया आपण रुजवल्या तर? मग दुसऱ्या दिवशी मी एक गादी वाफा तयार केला. एका तरटाच्या पोत्यावर माती पसरली. थोडे शेणखत मिसळले. पाणी देऊन त्यात मन लाऊन सर्व ८० बिया पेरल्या. त्यांना रोज वेळेवर पाणी द्यायला लागलो. कधी सावली तर कधी उन्हं दाखवून रोपटी उगवायला लागली. पाहिले तर ८० पैका ४० बियांनी तग धरला होता. म्हणजे ५० टक्के मॉर्टेलिटी रेट होता. होता होता त्या ४० रोपांनी तरारी दाखवली. आता रोजची निगा केल्याने ती दहा एक इंचांची झाली. वाटले आता या रोपांना असे न ठेवता कुडयात ट्रान्सप्लांट करू या. दहा कुंड्या आणल्या. त्यात खाली दगडावाळूवर एक थर नंतर त्यावर पालापाचोळा मग लाकडाचा भुस्सा व भाताची तुसे वर शेणखताचा थर व नंतर काळ्यामातीने कुंड्यांना तयार केले. प्रत्येकात ४ रोपांची लागवड केली आणि रोजच्या रोज पाणी, उन दाखवत ती रोपे आमच्या गच्चीत वाढायला लागली. काही वाचीव तर काही ऐकीव माहितीनुसार कीटकनाशकाची फवारणी, खते, नियमित पाणी व देखभाल यामुळे रोपांची वाढ यथायोग्य होत होती.

असे दहा महिने गेले. एके दिवशी रोपांना फुलोरा आला. पांढऱ्या रंगाच्या फुलांनी रोपे डवरली. पुढे काही दिवसांनी त्या फुलातून इवल्या इवल्या मिर्च्यांची फूट दिसायला लागली अन पाहता पाहता मिर्च्यांनी झाडे डवरली. पहिल्या तोडीत सव्वा दोन किलोच्या मिर्च्यांचे पीक आले! पुढे आणखी तीन तोडीत एकूण दहा किलो पर्यंत

तोड गेली!

मजा म्हणून सहज लावलेल्या एका मिर्चीतून दहा किलो मिर्च्या निर्माण झाल्याचे पाहून निसर्गाच्या अदभूत लीलेपुढे नतमस्तक होत... वंदन केले... अशी ही एका लाल मिर्चीची गोष्ट...

बंधो, शशी, तुझ्या उत्साही प्रोत्साहनामुळे पुन्हा कथन करायला मला हुरूप आला. तू कथन मोबाईलवर टेप करून असे सादर करशील असे वाटले नव्हते !...

**संकलनः– शशिकांत ओक...**

**कथनकार :- चुलत बंधू प्रकाश ओक.**

**मिपा वाचने ३०९१०**

- **काही प्रतिक्रिया**
- मिरचीआख्यान मस्त आवडले. :) असेच आणखी काही येऊद्या.
- एका चे शंभर करुन देणारा तो जगात एकच वेडा आहे, व सगळे शहाणे (निम, दिड व पुर्ण) तोंडात सिगारेटचा धुर काढत विचारतात की देव कुठे आहे?
- मृगनयनी जी,
  काहींना नाडीच्या मिरचीचा झटका बसला आहे. ते फोटो बद्दल नाव काढत नाहीत. काहींना नाडीच्या विषयाचा खाट नाकाच जाऊन सारखा उबळ आणतो असे दिसते आहे. काही हरकत नाही. निदान पुर्व लेखनाचा प्रभाव किती प्रखर आहे याची अशी सहज प्रचिती येते.



# २. कावळा बायकांनाच का शिवतो?

ही विचारणा तशीच राहून गेली. मोठे झाल्यावर ते आपोआप समजून आले!
मात्र ते कळायला मला माझा मठ्ठपणा कारणीभूत झाला. त्याचे झाले असे की सैन्य दलातील कँन्टीन स्टोअर्समधे टूथपेस्ट पासून फ्रिज, टीव्ही, कार पर्यंत सर्व वस्तू विकत घ्यायला झुंबड असते. नोकरीला लागल्या नंतर सुरुवातीच्या काळात मी कधीतरी शेव्हींग किट, तेल, साबण आणायला जात असे. एकदा गेलो असता एका सुंदर पॅकेट वर नजर पडली.

'ये क्या है?

'नैपकिन सरजी' काऊंटरवरील एयरमनने माहिती पुरवली.

'जरा एक निकालना' माझी फ़रमाईश.

'सिंगल पीस नही पूरा पैकेट लेना पडेगा ' चेहऱ्यावर वैताग दाखवत तो म्हणाला. अशा काउंटर ड्यूटीमुळे परेशान एयरमन मनात म्हणत असावा की माझे काम विमान दुरूस्त करायचे सोडून मी इथे कँटीनमधे आलेल्यांच्या फालतू विचारणात का वेळ घालवतोय?'

'ठीक एक पॅक देना 'मी ऑर्डर दिली.

त्याच्या शेजारच्या काउंटरवरील एक सीनियर सरदारजी 'चीफी उर्फ फ्लाइट सार्जेंट' म्हणाला,' सर, मॅडम नहीं आई?

'मॅडम क्या खाक आएगी! अभीतक मेरे घर बारात नही आयी है' मी सरदारजीला दमात घेत म्हटले.

"सर, ये लेडीज़ नैपकिन है। आपके-हमारे काम नहीं आयेंगे। दबक्या आवाजात सरदारजींनी पुरूषी सीनियारटी दाखवत दटावले. कधी कधी पँटचे झीप नीट बंद नाही असे दाखवून दिल्याबद्दल ओशाळलेला चेहरा होतो तसा करत मी

परतलो.

कावळा शिवल्यावर पुढे पुढे या पैकेट्सचे ढीग घरी येऊ लागले तशी हळू हळू उत्सुकता मावळली.

**मिपा वाचने ३०९१०**

**मजेशीर प्रतिसाद**

✧ पूर्वी नाटकांच्या दौऱ्यात बाजारहाटाची कामे मॅनेजर करीत असे. तेंव्हा एके सकाळी मॅनेजर बाजारहाटाला निघाला असता नाटकाच्या नायिकेने त्याला एक पाकीट नॅपकीन आणायला सांगितले. शेजारी उभ्या असलेल्या नायकाला हे जरा कमीपणाचे वाटले. मी नायक आहे, माझ्या जीवावर आज नाटक गल्ला कमविते आहे आणि नॅपकीन नायिकेला? हे त्याला रुचले नाही त्यामुळे त्याने मॅनेजरला सांगितले, 'एक पाकीट माझ्यासाठीही घेऊन या.' सॅनिटरी नॅपकीनचा वापर नव्याने सुरु झाला होता. त्यामुळे सर्वांना त्या बद्दल कल्पना नव्हती. त्या वस्तुच्या अज्ञानातूनच नायकाने तशी मागणी केली होती. मॅनेजरने त्याला कोपऱ्यात घेऊन समजावून सांगितले तेंव्हा तो ओशाळला. नायिका मात्र जाम हसत सुटली.

सर, ये लेडीज़ नैपकिन है। आपके-हमारे काम नहीं आयेंगे।

हे सांगितल्यावर तुम्हाला तरी काय ते कळले होते का? की "असेल बुवा काहीतरी" म्हणून परतलात? ही गोष्ट साधारणतः१९७२ -७५ च्या सुमाराची असावी. त्याकाळी अशी काही वस्तु असते, हे मलाही ठाऊक नव्हते, त्यामुळे तुमच्या जागी जर मी असतो, तर "कोई बात नही, हात-मूंह तो पोछना है, उसमे लेडिज क्या और जेंट्स क्या, दे दो एक पैकेट" असे म्हणालो असतो.... :)

✧ लहान मुले वगैरे लोकांना ताकास तूर लागू नये म्हणून ह्या निसर्गधर्माकरता एक साधासोपा वाटणारा परवलीचा शब्द (कोडवर्ड) बनवला आहे. पण त्याचा अर्थशः संदर्भ घेतल्यामुळे होणारी फसगत, गंमत हा ह्या विषयाचा मुख्य मुद्दा असावा असे वाटते.

मलाही असा अनुभव आला आहे. कावळा शिवणे ह्याचा खऱ्याखुऱ्या कावळ्याशी संबंध आहे असे मलाही लहानपणी वाटायचे आणि तसा अर्थ लावला तर सगळे हसतात म्हणून मला खूप रागही यायचा. हे लोक माझ्यापासून काहीतरी लपवत आहेत असे सारखे वाटायचे आणि ते खरेही होते. पण पावित्र्याच्या परंपरागत कल्पनांमुळे नैसर्गिक पण ओंगळ वाटणाऱ्या घटनांना निरुपद्रवी नाव द्यायची पद्धत काही वेळा भलताच अनर्थ करतात हे इथेही दिसून येते.

✧ -----




## माधवनगरच्या आठवणीतून...

# ३. गोगटे काकांच्या घरचे फिस्टचे निमंत्रण



आज कालच्या आरोग्य मंदिरा समोर गुरुवार पेठेतील आमच्या घराच्या अंगणात सायंकालीन रिंग खेळणे हे इतके सहजपणे होत असे कि तो पायंडाच पडला होता. मे महिन्यात पाण्याचा सडा घालून, नेट बांधायचे डांब वेळोवेळी पहारीने ठोकून ठाकून घट्ट तयार केले की जितके टाईट बांधता येईल तितका नेटचा दोर खेचायला गठ्ठ्या सारखा गबदुल तातडीने कामाला येई. त्या आधी आम्ही खेडकरांच्या बंगल्यासमोर कोर्टावर जात असू. चाळीतील कोकणी चेहऱ्याच्या मधु नाईकला त्या काळात हरवणे अशक्य बाब होती. तुफान वेगाच्या सर्विसवर तो अर्धे पॉईंट वसूल करे. नेटपाशी लॉबीला न ओलांडता हळूच पास करत करत तो गुंतवून एकदम तडाखेबंद फोरहँडचा फटका आमच्या आवाक्याबाहेर होत असे. जर चुकून टप्पा

आऊटर बाहेर पडला तरच सर्व्हिस ब्रेक होत असे.

तो नोकरी निमित्ताने पिंपरीत गेला. पैसे खिशात खुळखुळायला लागले. सुटीत आला की त्यात त्याने मैत्रीणीवर केलेल्या खर्चाची यादी ऐकायला मिळाली की त्याचा हेवा वाटायला लागला. अंधारात केलेल्या मजेचे किस्से ऐकणे ही त्या वेळी फीस्ट असायची...!

फीस्टवरून आठवण होते ती गोगटे काका आणि काकूंच्या कडील भोजनाचा किश्याची ...!

आमच्या बंगल्याशेजारच्या बंगल्यात ६६ च्या सुमारास ते राहायला आले. कॉटनमिलमधे उच्च पदावर ते होते इतपत आम्हाला माहीत होते. दर शुक्रवारी स्क्रीनचा अंक त्यांनी वाचला की आमच्या सारख्यांना हिंदी सिनेमा जगतात काय घडामोडी घडत असत ते कळे....

बाहेर तसेच घरगुती वेषातून अत्यंत नीट नेटक्या व्यक्तिमत्वाला धार होती. काकूंचे घारे डोळे असूनही प्रेमळ वाटायचे. सुभाष, सतीश त्यांची मुले आमच्यात रुळली. रिंग, क्रिकेट खेळात सामिल व्हायला लागली.

एका सणाला आम्हाला जेवणाचे निमंत्रण मिळाले. ताटे सरळ रेषेत मांडलेली. नाजुकशी सुंदर रांगोळी ताटाच्या थाटाला साजेशी होती. आम्हाला हातपाय धुवून आल्यावर लगेच काकांनी तयार ठेवलेल्या हँडटॉवेलला हात पुसून मांडी घालून बसलो. सर्वात शेवटी सतीश व सुभाष बसल्यावर, वाढायला सुरवात झाली. ताटाला डाव्या उजव्या ठरलेल्या भागात चटणी, लोणचे, कुरडया, पापडाने जागा घेतली. शुभ्र मुदीच्या भातावर पिवळ्या धम्म वरणाचे आवरण पडले. तोवर साजुक तुपाची धार पडली. आम्ही आचमन घेऊन चित्राहूती काढल्या. आता हाता तोंडाची गाठ पडणार तोवर वदनी कवळ म्हणायची सक्ती कंटाळवाणी वाटली.

'करा सुरवात' अशी काकांनी आज्ञा केली तोवर सुभ्याने वरणभाताला आपलेसे करायला सुरवात पण केली होती! मी गोड्या, मी पहिल्या घासात श्रीखंडवाटीत बोट घालून केशरकाडी सकट सुगंधी गारेगार चव घेत राहिलो. काकांनी लगेच, 'मी फेटले आहे बरंका' म्हणून आपल्या सहकार्याची पावती दिली.

'वा, फारच सुंदर, मी म्हणालो. तिकडे रव्या, अव्या तोंडलीवाल्या मसाले भातावर पुन्हा तूप घालून घेताना संकोच करायला लागले.' अहो वाढा त्यांना' सांगलीत गेलो की साजुक तुपाचा डबा आम्ही आवर्जून आणतो बरं का' काकांनी शुद्धतेची ग्वाही दिली.

फ्रिज तेंव्हा लग्झरी होती. तांब्यावर बाहेरून अवतरलेल्या गार गार थेंबाना पाहून

पाणी पिण्यासाठी तहान वाढली. सुभ्याने दोन गरगरीत फुगलेल्या पुऱ्या घेताना तिसरी मागून आपली आवड सुचवली.
'अहोंच्या हाताला सुगरणीची चव आहे बरं का'! पत्नीवर अशी कौतुकाची पखरण आम्हाला आमच्या घरी कधी अनुभवायला मिळत नसल्याने जरा कावरेबावरे झाल्यासारखे वाटले...!

अव्याला आमटी आवडत असली तरी त्या दिवशीच्या फीस्ट मधे बटाट्याच्या भाजीवर तो तुटून पडला होता. मला श्रीखंड खुणवत होते. तर रव्या तोळामासा प्रकृतीचा. ताटातील पदार्थ टाकायचे नाहीत, नाही तर त्यांचे बापू कावायचे, चवीने खाऊन सर्व संपवायचे अशा शिस्तीचा तो.

' अरे घ्या रे, चापून खा!'
सतीश, आणि सुभाष ही त्यांची मुले समोरच्या पंगतीत होते. त्यांना घसघशीत वाढताना पाहून आमचा संकोच दबला. सुभ्याने पुऱ्या संपवायचा चंग बांधला. माझ्या व अव्यावर श्रीखंड वाटीत पडले की संपले अशी जणू शर्यतच लागली. काकूंना मदत करणाऱ्या बाईंची पुऱ्या तळताना तारांबळ उडालेली पाहून काका खूष वाटले.

'नाही म्हणजे पापड कसे वाटले' ? रव्याने पुन्हा मागितल्या बरोबर नरगुंद्यांच्या व्हरायटी स्टोअर्सच्या सिलेक्टेड व्हरायटीतून ते आले असल्याचे त्यांनी सांगितले.

भगवानदास कंदी पेढे, मारुती रोड वरच्या दुकानातून मिळवले फरसाण, वगैरे उत्स्फूर्त माहिती सांगलीच्या ख्यातीत भर घालत होती.

आपल्या मुलांच्याकडे कौतुकाने पहात ते म्हणाले, 'अहो, सतीशने तिसरी पुरी घेतली बरं का! असे पंगतीला बसले की आहार वाढतो बरं का!'

काकांना 'बरं का' म्हणताना पाहून खूप जवळपण आले. रोज टाय घातलेल्या वेषात पाहून सवय झालेल्या आम्हाला त्यांच्या प्रेमळपणात आपुलकी दिसली. कणकेचा गोळा पुन्हा गुंदायला गेला तेंव्हा अहोंच्या हाताला कशी चव असते असे कोड कौतुक ज्या पद्धतीने झाले ते आजही ५०-६० वर्षे उलटली तरी आठवते.'
'पुरणपोळी खावी तर अहोंच्या हातची! उकडीचे मोदक ओ ऽऽऽहो हो! आणि नॉन व्हेजची हैदराबादी मटण बिर्याणी तर काय विचारू नका बरं का!

मग कसा काय वाटला बेत? काकांनी आमच्या हातात मसाला विडे देत विचारले. आमच्यात सुभ्या बेरका! काकांना तारीफ करायला व करून घ्यायला आवडते हे लक्षात घेऊन, काकूंच्या प्रत्येक पदार्थाचे असे गुणगान करायला सुरवात केली. काका काकू, आजची फीस्ट कायम लक्षात राहील अशी झाली. आमच्या

कुरुंदवाडच्या चक्क्याचे श्रीखंड अप्रतिम! काय शश्या? म्हणून माझ्याकडून कौतुकाचे बोल बोलते करायला लावले. 'काका फारच चवदार होते बुवा श्रीखंड, वेलची पूड, जायफळाची मात्रा, केशरी रंग! वाऽ वाऽ... चव घोळतेय जिभेवर.' रव्याला चटणीबरोबर आलेल्या कुरडया कशा कुरुमऽऽ कुरुम करत खायला मिळाल्या हे ऐकून काका काकूंच्या चेहऱ्यावर समाधानाचे हास्य दिसले.

'पण एक विचारतो' काकांना मसाला पानाला कौतुकाच्या यादीत १२वा गडी म्हणून वाटले की काय? असे हुशार अव्याने ताडले. 'सर्वावर कडी केली ती पानाने! चांदीच्या वर्खात, गुलकंदात कातरलेल्या सुपारीच्या खांडाचे बंबई मसाला पान काका तुम्ही फ्रिजमधून काढलेत... तेंव्हापासून केंव्हा तोंडात भरतोय असे झाले होते! एक आणखी मिळेल का?' काकांनी फ्रीजमधले ४ विडे काढून आम्हा प्रत्येकाला दिले...! अहोंकडे पहात म्हणाले, 'मुलांनी असं मागितलं की बरं वाटतं, बरं का' !
गोगटे काकांच्या घरचे निमंत्रण पुन्हा कधी मिळेल या आशेवर आम्ही त्या दिवशीच्या फीस्टच्या चवीला रसनेवर घोळवतोय...

गोगटे कुटुंब दुसऱ्या मिलमधील ऑफर आल्यावर माधवनगरच्या वास्तवाची छाप कायम ठेवून गेले.

**मिपा वाचने ३०९१०**

# आयला या बायका म्हणजे......हुऽऽऽश्श

**शीर्षक वाचले .. आणि**
बोंगाली भाषी नटखट किशोर कुमार आठवला... मेरे दिलमें प्यार इल्ले इल्ले!



म्हणणाऱ्या प्रियकराला सुरवातीलाच 'पेकाटात लाथ' घालून मदरासी नृत्यांगना पद्मिनी, 'रागिणी' (1958) सिनेमात स्टेज डान्समधे खेळकरपणे 'मेरा हो ज्जा' म्हणताना, मैं बंगाली छोकरा ऐका व टेन्शन दूर करा. होलीचा मूड बनवा. शिवाय हे ऐकले तर आणखी ही गाणी फ्री...!



या गाण्यात नायिका, पद्मिनीच्या संदर्भात माझ्या बाँके नाचाच्या चर्चेने 'रूस में मची धूम' असे कदाचित कमरजलालाबादींनी म्हटले असावे...आशाच्या आवाजातील मदरासी लेहज्यात 'मैं' वर घेतलेली हरकत भावते तर कडव्यांच्या नंतर क्लेरोनेटमधील सिग्नेचर कॉम्पो ऐकू आली की ओपी ची ही जादू आहे हे सहज समजते.

अशी अवखळ गाणी आठवली तर ऐकायला आवडेल...

# कौन है...वो दिलरुबा?

बुड्ढा मिल गया सिनेमातील एक नटखट गीत

कहो ना हमसे ज़रा...




## देर से आना और ये केहना वादा तो निभाया

देर से आना और ये केहना वादा तो निभाया

